हज हाऊस, औरंगाबाद या इमारतीच्या बांधकामाकरिता सिडको लि. यांना वर्ष २०१५-१६ करिता पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध झालेला रु. १.२६ कोटी निधी वितरित करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## अल्पसंख्याक विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांक :- हज-२०१५ /प्र.क्र.१५७/ का-५

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०३.११.२०१५

**वाचा-**

१.शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र हज-२००९/प्र.क्र.५८/कार्या.-५, दि. २२.०१.२०१०
२.शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र हज-२००९/प्र.क्र.५८/कार्या.-५, दि.१६.०३.२०१०,
३.शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र हज-२००९/प्र.क्र.५८/कार्या.-५, दि. ३१.०३.२०१०,
४.शासन ज्ञापन महसुल व वन विभाग क्र जमीन ३९१२/प्र.क्र.५३/ज-७, दि. २२.०८.२०१३,
५.शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र हज-२००९/प्र.क्र.५८/कार्या.-५, दि. १५.०१.२०१४,
६.शासन पत्र क्र. , हज-२००९/प्र.क्र.५८/कार्या.-५, दि. २९.०६.२०१३,
७.मुख्य अभियंता, सिटी ॲण्ड इंडस्ट्रियल डेव्हलपमेंट कार्पोरेशन ऑफ महाराष्ट्र लि, मुंबई यांचे पत्र क्र. CIDCO/CE (N)/१९२, दि. १०.०२.२०१४,
८.कार्यासन अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे क्र. २०१४/प्र.क्र.०३/इमारती-१, दि. १०.०२.२०१४
९.शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र हज-२००९/प्र.क्र.५८/कार्या.-५, दि. १५.०५.२०१४.
१०. शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र. हज-२०१५/प्र.क्र.१५७/का-५, दि. २२.०६.२०१५
११. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. पूरक-२०१५/प्र.क्र. १४०/अर्थसंकल्प-३, दि. ०३.१०.२०१५

**प्रस्तावना :-**

औरंगाबाद येथील सर्व्हे क्र. ६६५६ मधील शाही मस्जिद जवळ हज हाऊस चे बांधकाम सिडको लि. मार्फत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. या साठी शासनाकडून सिडको लि. शी सामंजस्य करार (MOU) करण्यात आला आहे. हज हाऊस, औरंगाबाद च्या बाधकामाच्या प्रकल्पाचा एकूण खर्च रु. २९.८८कोटी इतका आहे. सिडको लि. यांना रु. ६.९४ कोटी इतकी रक्कम यापूर्वी या कामी अदा करण्यात आलेली आहे. सामंजस्य करारानुसार उर्वरीत रक्कम सिडकोला टप्प्या टप्प्याने अदा करण्यात येणार आहे. त्यापैकी सन २०१५-१६ या वर्षाकरिता रु. १.२६ कोटी ( रुपये एक कोटी सव्वीस लक्ष फक्त ) इतका निधी सिडकोला वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय:-**

औरंगाबाद येथील हज हाऊस बांधकामासाठी रु. २९.८८ कोटी इतक्या सुधारित प्रकल्प खर्चास उपरोक्त अ.क्र. ( ९ ) येथील आदेशान्वये द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाच्या कालावधीकरिता पहिल्या आठ महिण्यासाठी अर्थसंकल्पात हज हाऊसच्या बांधकामाकरिता रु. ४.२० कोटी इतकी तरतूद करण्यात आली आहे. या तरतूदीमधून एकूण अनुदानाच्या ७०% च्या मर्यादित रु. २.९४ कोटी ( रुपये दोन कोटी चौऱ्यान्नव लक्ष फक्त ) इतकी रक्कम सिडको ( सिटी ॲण्ड इंडस्ट्रियल डेव्हलपमेंट कार्पोरेशन ऑफ महाराष्ट्र लि, मुंबई ) यांना उपरोक्त ब.क्र. ( १० ) आदेशान्वये अदा करण्यात आली आहे. या आदेशान्वये सन २०१५ च्या द्वितीय पूरवणी विनियोजन अधिनियमानुसार मंजूर झालेल्या रु. १.८० कोटी इतक्या रक्कमेच्या पूरक मागणी च्या ७०% च्या मर्यादेत रु. १.२६ कोटी ( रुपये एक कोटी सव्वीस लक्ष फक्त ) इतका निधी वितरित करण्यास या आदेशाद्वारे मंजुरी देण्यात येत आहे.

२. सन २०१५-१६ या वित्तीय वर्षात मागणी क्र. झेड ई-१ ए, मुख्य लेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाज कल्याण २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना ( ०१ ) ( १९ ) हज कमिटीला सहाय्यक अनुदान ( २२३५ ए- २७६ ) या लेखा शीर्षाखाली उपलब्ध असलेल्या एकूण तरतूदीमधून रु. १.२६ कोटी ( रुपये एक कोटी सव्वीस लक्ष फक्त ) इतका निधी महाराष्ट्र राज्य हज समितीमार्फत " उपाध्यक्ष आणि व्यवस्थापकिय संचालक, सिटी ॲण्ड इंडस्ट्रियल डेव्हलपमेंट कार्पोरेशन ऑफ महाराष्ट्र लि, मुंबई ( सिडको)" यांना वितरीत करण्यासाठी याद्वारे महाराष्ट्र राज्य हज समितीकडे सुपूर्द करण्यात येत आहे.

३. कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई यांनी रु. १.२६ कोटी ( रुपये एक कोटी सव्वीस लक्ष फक्त ) इतक्या रकमेचा धानादेश " उपाध्यक्ष आणि व्यवस्थापकिय संचालक, सिटी ॲण्ड इंडस्ट्रियल डेव्हलपमेंट कार्पोरेशन ऑफ महाराष्ट्र लि, मुंबई ( सिडको )" यांच्या नावे काढून तो त्यांना रितसर सुपूर्द करावा. तसेच त्यांनी " उपाध्यक्ष आणि व्यवस्थापकिय संचालक, सिटी ॲण्ड इंडस्ट्रियल डेव्हलपमेंट कार्पोरेशन ऑफ महाराष्ट्र लि, मुंबई ( सिडको )" यांच्याकडून झालेल्या खर्चाबाबतचा तपशिल प्राप्त करुन घेवून त्या आधारे विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

४. प्रस्तुत प्रयोजनासाठी होणारा खर्च **मागणी क्र. झेड ई-१ ए, मुख्य लेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाज कल्याण २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनेंतंर्गत योजना ( ०१ ) ( १९ ) हज कमिटीला सहाय्यक अनुदान ( २२३५ ए- २७६ )** या लेखा शीर्षाखाली सन २०१५-१६ या वित्तीय वर्षात मंजूर सहायक अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०३१६४४१५३३१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anees Iqbal Ismail Shaikh

Digitally signed by Anees Iqbal Ismail Shaikh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=447981acddcc5079f9c00eadfad2054d955a80a21de6164c4024daf5a9ea2c97, cn=Anees Iqbal Ismail Shaikh
Date: 2015.11.03 16:45:28 +05'30'

**( अनिस शेख )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
३. महालेखापाल -१/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर
४. अधिक्षक अभियंता ( एम. टी.) सिडको, उद्योगभवन, औरंगाबाद,
५. जिल्हा कोषागार अधिकारी, आरंगाबाद,
६. कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई
७. खाजगी सचिव, मा. मंत्री /मा. राज्यमंत्री ( अ.वि.वि.) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई,
८. स्वीय सहायक, प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. स्वीय सहायक, सह सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग,मुंबई,
१०.स्वीय सहायक, उप सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग,मुंबई,
११.कक्ष अधिकारी (का-७), अल्पसंख्याक विकास विभाग, मुंबई,
१२.वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३.निवड नस्ती ( कार्यासन-५), का-५ संग्रहार्थ.